शनीला ज्या अर्थी सूर्याचा पुत्र मानिला आहे, त्या अर्थी सूर्यांत व शनींत कांहीं तरी साम्य असलेंच पाहिजे. सूर्यमालेंत सूर्य खेरीज करून एकंदर आठ ग्रह आहेत. त्याच प्रमाणे शनीलाही आठ उपग्रह असून ते त्याच्या भोंवती प्रदक्षिणा करितात. यावरून त्यास सूर्यपुत्र हें नांव पडलें असावें.

राहूस सर्प फणि वगैरे दरींच नांवें आहेत.

सर्पास अगदीं सरळ चालतां येत नाहीं त्याप्रमाणे याचीही गति इतर ग्रहा प्रमाणें नसून उलट आहे, म्हणून त्यास सर्प फणि हीं नांवें पडलीं असावीं.

केतूस ध्वज, शिखी अशीं नांवें आहेत.

वरील नांवांवरून पाहतां त्याचा आकार आपणास धूमकेतु प्रमाणे आकाशांत दिसला पाहिजे, परंतु तो मुळींच दिसत नाहीं; कारण राहु, केतु हे ग्रह नसून काल्पनिक बिंदु आहेत. बहुतक धूमकेतु च्या आकारावरूनच त्यास ध्वज शिखी अशीं नांवें पडलीं असावीं

## ग्रहांचे गुण, स्वभाव व स्वरूप.

रवि—सत्वगुणी, पराक्रमी, बांधेसूद, काळसर तांबूस पित्तप्रकृति आहे.

दया, क्षमा, शांति, खरेपणा इत्यादि गुणांचा दर्शक जो गुण त्यास सत्वगुण म्हणतात. " मनुष्यांचा व ग्रहांचा संबंध काय? आणि ते मनुष्यावर काय म्हणून अंमल चालवितात ? " या प्रश्नाचे उत्तरांत सूर्यापासून मनुष्यांस कोणकोणत्या प्रकारचे फायदे होतात व सूर्य नसल्यास किती नुकसान होईल, याचें वर्णन केलें आहे. त्यावरून सूर्याचे अंगीं दया, परोपकार वगैरे अनेक सद्गुण

असल्यांचें वाचकांस दिसून येईल. या वरून सूर्यास सत्वगुणीच कां ठरविलें याचें कारण सहज समजून येईल. सूर्याच्या उष्णता देणाच्या शक्तिवरून व त्याच्या उष्णतेच्या व प्रकाशाच्या होणाऱ्या कार्यावरून तो पराक्रमी कां आहे हें सांगावयास पाहिजे असें मुळींच नाहीं. सूर्यबिंब सुरेख व गोल दिसतें त्यावरून त्यास शांधेसूद म्हटलें आहे. त्याचा रंग तांबूस आहे पण सूर्यावर काळे डाग दिसतात असें अलिकडे खात्रीपूर्वक सिद्ध झालें आहे, म्हणून त्यास काळसर तांबूस म्हटलें आहे. उन्हांतून आल्याबरोबर आपणास तहान लागते व पुष्कळ पाणी प्यावेसें वाटतें, पण उन्हांतून आल्याबरोबर कांहीं एक न खातां पाणी प्यालास पित्त वाढतें असा अनुभव आहे. उन्हाळयांत, उन्हाळा लागण्याचे सुमारास वसंपण्याचे सुमारास असा प्रकार वारंवार घडून येतो; या वरून त्यास पित्तप्रकृति ठरविलें असावें.

चंद्र—सत्वगुणी, नेत्रसुन्दर, प्रवासी गोंडस कफवातप्रकृति आहे.

चंद्राच्या आकर्षणामुळें होणाऱ्या भरती ओहटी पासून समुद्राचें पाणी स्वच्छ राहण्यास किती उपयोग होतो, चंद्रप्रकाशापासून कसें सुख होतें, या अनुभवावरून त्याचें अंगी सत्वगुण नाहीं असें कोण म्हणेल? चंद्रबिंब आपल्या डोळयांस सुंदर दिसतें म्हणून त्यास नेत्रसुंदर म्हटलें असावें. चंद्रास आपल्या कक्षेतून पृथ्वीभोंवती नेहमी फिरावें लागतें, यावरून त्यास प्रवासी म्हटलें आहे. चंद्रबिंबास गोंडस कां म्हटलें आहे, हें त्याच्याकडे पाहिल्यांन सहज दिसून येईल. मनुष्य सुखावल्यास वात होतो व थंडीनें कफ होतो हें सर्वांस माहित आहेच चंद्रप्रकाशाचे

अंगी सुख देण्याचें सामर्थ्य आहे, व चंद्रप्रकाशांत शीतता आहे यावरुन त्यास कफवातप्रकृति म्हटलें असावें.

मंगळ — तमोगुणी' नेत्रक्रूर, तांबुस गोरा, अवयव सुंदर व पित्तप्रकृति आहे.

अज्ञानानें किंवा क्रोधादिकांच्या आवेशानें कर्तव्याकर्तव्य विचार न राहण्याची अवस्था ज्यांत असते त्यास तमोगुण म्हणतात. त्याच्या रक्ततेस अनुसरुन तो क्रूर ग्रह मानिला आहे, हें मागें सांगितलेंच आहे;व त्यावरुन त्यास तमोगुणी ठरविलें असावें. नेत्र क्रूरही म्हणण्याचें कारण तेंच आहे. तो आकाशांत प्रत्यक्ष तांबूस दिसतो, म्हणून त्यास तांबूस गोरा म्हटलें आहे. तो रजनीरूपी स्त्रीचा सौभाग्यसूचक तिलकच आहे कीं काय अशा कल्पनेनें त्यास अवयवसुंदर म्हटले असावें. मंगळाच्या रक्तवर्णावरुन त्यास अग्नितत्व मानिले आहे व याच कारणावरुन त्यास पित्तप्रकृति ठरविले असावें.

बुध—रजोगुणी, श्यामवर्ण, कृश, संपत्तिमान, बुद्धिमान, विद्वान व कफवातप्रकृति आहे.

कामेच्छा, लोभ' गर्व असत्यता इत्यादि गुणांचा दर्शक जो गुण त्यास रजोगुण म्हणतात मोठ्या संपत्तिमान लोकांच्या भोंवतीं घिरट्या घालणारी मंडळी कोणत्या प्रकारची असते, हांजी हांजी करुन यजमानाची मर्जी खुश ठेवून आपल्या स्वार्थ साधण्यांत कशी पटाईत असते, हें सांगण्यास पाहिजे असें मुळींच नाहीं बुध हा सूर्यापासून फार जवळ आहे म्हणजे तो ग्रहमालेचा राजा जो सूर्य त्याचे जवळ नेहमी असतो, म्हणून त्यास रजोगुणी म्ह-

टलें असावें बुध हा ग्रह लहान असल्यामुळें चांगला तेजस्वी अ-सा दिसत नाहीं म्हणून त्यास शामवर्णी म्हटलें असावें. सूर्याची उष्णतारूप संपत्ति त्यास सर्व ग्रहांपेक्षां जास्त मिळते म्हणून त्या-स संपत्तिमान म्हटले असावें. त्याचें सूर्याशीं सान्निध्य असल्या-मुळें त्यास बुद्धिमान व विद्वान म्हटलें आहे त्याचे अंगी दुसऱ्या-स उष्णता देण्याचें सामर्थ्य नाहीं परंतु तो ग्रहमालेच्या राजाची त्याचें जवळ राहून नेहमी सेवा करितो म्हणजे दुसऱ्यास सुख दे-तो सुखानें व थंडीनें कोणती कार्यें होतात, हें चंद्रास कफवातप्रकृ-ति कां म्हटले आहे त्यांत सांगितले आहें. व याच कारणामुळें बुधासही कफवातप्रकृत्ति ठरविलें असावें.

गुरु—सत्वगुणी, पोट मोठें, पिवळसर, कफ प्रकृति आहे. सूर्य खेरीज करून सर्व ग्रहांत गुरु आकारमानानें मोठा आहे. चंद्र इतका लहान असूनही त्याचा पृथ्वी वर परिणाम होतो. ( मनुष्यांचा व ग्रहांचा संबंध काय ? आणि ते मनुष्यावर काय म्हणुन अंमल चालवितात या प्रश्नाचें उत्तर पहा. ) तेव्हां गुरु जरी पृथ्वीपासून लांब असला तरी त्याच्या आकारमानानें पृथ्वी वर कांहीं तरी अनुकूल परिणाम होत असलाच पाहिजे; म्हणून त्यास सत्व गुणी म्हटलें असावें. त्याचा आकार फार मोठा अस-ल्यामुळें त्याचें पोट मोठे मानिले आहे. तो शुक्रा सारखा पांढरा व तेजस्वी दिसत नाहीं किंचित पीवळसर दिसतो, म्हणून त्यास पिवळसर म्हटलें आहे. त्यास सूर्यां पासून पृथ्वीच्या $\frac{१}{२७}$ उष्णता

मिळते, व त्याच्या पासूनही इतरास फारशी उष्णता मिळत नाहीं; म्हणून त्यास कफप्रकृति म्हटलें आहे.

शुक्र— रजोगुणी, सौंदर्यवान, संपत्तिमान, वातकफप्रकृति आहे

ग्रहमालेंत बुध व शुक्र हेच सूर्याच्या जास्त जवळ आहेत. बुधास ज्या कारणामुळें रजोगुणी ठरविलें आहे, त्याच कारणामुळे यासही रजोगुणी ठरविलें असावें. तो डोळयांस प्रत्यक्ष सुंदर दिसतो म्हणून त्यास सौंदर्यवान म्हटलें आहे. शुक्रास सूर्यापसून पृथ्वीपेक्षां जास्त प्रकाश व उष्णतारूपी संपत्ति प्राप्त होते म्हणून त्यास संपत्तिमान म्हटलें आहे शुक्राकडे पाहिल्यास तो आपल्या डोळयांस सुंदर दिसतो व मनास आल्हाद देतो. काळोख्या रात्री शुक्राचे थोडेसें चांदणं पडतें म्हणजे एकंदरींत लोकांस सुख देण्याचें त्याचें अंगीं सामर्थ आहे, परंतु उष्णता देण्याचें मात्र सामर्थ्य नाहीं म्हणून त्यास वातकफप्रकृति ठरविलें असावें.

शनि— तमोगुणी, अवयवकृश, काळा आळशी व कफवातप्रकृति आहे.

प्राचीन युरोपियन लोकांनी यास क्रुर मंद अविवेकी असा सॅटर्न नामक देवतेचं नांव दिलें आहे. हा गतीनें मंद, तेजानें हीन, मागें पुढें जाऊन एकेका नक्षत्राचा पिच्छा पुरविणारा असा आहे; म्हणुन त्यास तमोगुणी म्हटलें असावें शनीच्या भोंवतीं वलयें आहेत व तीं वलयें शनीचा भाग असल्याप्रमाणें त्यास सोडून कधीं जात नाहींत. म्हणून त्यास अवयवकृश म्हटलें आहे. त्याच्या मंद गतीवरून त्यास आळशी म्हटलें आहे. शनीस सूर्यापासून उष्णता व प्रकाश हीं पृथ्वीच्या फक्त $\frac{१}{९१}$ मिळतात. शनी

भोंवतालचीं वलयें व स्वतः शनि हीं अद्याप वायुरूप स्थितींत आहेत म्हणजे शनी वाततत्त्व आहे. या कारणावरून त्यास कफवात प्रकृति ठरविलें असावें.

## निरनिराळ्या राशींचें स्वामित्व ।

आपल्या ग्रहमालेंत सूर्य हा मध्य असून त्याच्या भोंवतीं पृथ्वी खेरीज करून बुध, शुक्र, मंगळ, गुरु, शनि हे ग्रह फिरत आहेत. फल ज्योतिषांत घेतलेल्या नवग्रहांपैकीं राहु, केतु हे काल्पनिक बिंदु आहेत. बाकी राहिले सात ग्रह; हे बारा राशींचे स्वामि आहेत. खगोळशास्त्रांत ग्रहांचा जो क्रम दिला आहे, त्याच क्रमानें राशींचे विभाग करून त्यांचें स्वामित्व ग्रहांस दिलें असावें; असें खालील कोष्टकावरून दिसून येईल.

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शनि | गुरु | मंगळ | शुक्र | बुध | चंद्र | रवि | बुध | शुक्र | मंगळ | गुरु | शनि |
| ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| कुंभ. | मीन. | मेष. | वृषभ. | मिथुन | कर्क. | सिंह. | कन्या. | तूळ. | वृश्चिक | धन. | मकर. |

आतां कोणी असें म्हणेल कीं, मंगळाच्या वांट्यास पहिला भाग जो मेष राशी ती कशी आली? मंगळ हा ग्रह ग्रहमालेंस-ला कांहीं पहिला ग्रह नाहीं. ' र याचे कारण असें आहे कीं, मंगळाचा रंग तांबडा आहे, मेष राशीचा रंग तांबडा आहे. मंग-ळ उग्र ग्रह आहे, मेष उग्र राशी आहे. मंगळ [illegible] आहे, मेष

राशी क्षत्रिय आहे मंगळाचा स्वभाव क्रूर आहे, मेष राशीचा स्वभाव क्रूर आहे. असें दोहोंतहीं साम्य असल्यामुळें मंगळास मेष राशीचे स्वामित्व दिले असावें त्याच प्रमाणे कोणी असें म्हणतील कीं, सूर्य ग्रह मालेचा मध्य असतां त्याचे वांटयास पांचवा भागची सिंह राशी तो कशी आली! त्याचें कारण असें आहे कीं सूर्य ज्या वेळी सायन सिंह राशींत प्रवेश करितो त्यावेळीं वर्षा ऋतुस आरंभ होतो. या वेळेपर्यंत सूर्यानें आपल्या प्रखर तेजाच्या योगाने पाण्याची जी वाफ केलेली असते ती या वेळेस पर्जन्यरूपानें खालीं पडत असते; म्हणजे सूर्य किरणांचा पराक्रम प्रत्यक्ष अनुभवास येत असतो यावरून सिंह राशी व सूर्य यांच्या पराक्रमसादृश्यावरून सिंह राशींचें स्वामित्व सूर्यास दिले असावें वरील विवेचनावरून बाकींच्या राशींच्या स्वामित्वाबद्दलही तर्क करण्यास वाचकांस सोपें पडेल.

## ग्रहांचे वयोमान ।

मंगळ—बाल. बुध—कुमार. गुरु—३० वर्षांचा. शुक्र—१६ वर्षांचा. रवि—५० वर्षांचा. चंद्र—७० वर्षांचा. शनि, राहु, केतु— हे १०० वर्षांचे.

यांत रवि५० वर्षांचा मानिला आहे, मनुष्यजातीच्या किंबहुना सृष्टीच्या उत्पत्तीपासून सूर्याचें अस्तित्व अहे; हें सर्वांस कबुल करावें लागेल इतक्या लांबची जरी कल्पना करण्याचे कोणास कठिण वाटलें तरी निदान चार पांच हजार वर्षांपासून सूर्य खात्रीनें अहेच, याबद्दल इतिहास देखील साक्ष देईलच. ग्रह काय

पदार्थ आहे या प्रश्नाचें उत्तरांत सूर्य हल्लींच्या स्थितींत आस्थास कित्येक लाख— किंवा कोटी— वर्षें झालीं असतील, व पुढेंही अशींच कित्येक कोटी वर्षें जातील असें म्हटलें आहे असें असतां सूर्य पन्नास वर्षांचा कसा! आयुष्यमर्यादा १०० वर्षें धरिल्यास या गोष्टीचा खुलासा सहज होईल. १०० वर्षांच्या आयुर्मर्यादेच्या मानानें पाहतां आपला सूर्य अगदीं मधल्या स्थितींत आहे म्हणजे जळण्याच्या पूर्ण भरांत आहे आता येथून पुढे त्यास उतरती कळा लागणार ( यांत आतां येथून जरी म्हटलें आहे तरीतें देखील कित्येक कोटी वर्षें लागतील ) म्हणुन तो ५० वर्षांचा मानिला असावा चंद्र अगदीं थंडगार झाला आहे त्यावर हवा, पाणी यांतले कांहीं एक स्वाभाविक स्थितीत नाहीं तो जीर्ण झाला आहे, म्हणुन त्याचें वय ७० वर्षांचे मानील असावें वरील विवेचनावरून बाकीच्या ग्रहाच्या वयांबद्दल कल्पना करितां येईल,

## ग्रहांचे अधिकार ।

सूर्य–राजा. चंद्र–राणी. मंगळ–सेनापती. बुध–युवराज. गुरु, शुक–सचिव. शनि–सेवक.

सूर्य सर्वांपेक्षां मोठा व पराक्रमी आहे, म्हणून तो राजा मानिला हें योग्यच आहे. सर्वस्वी सूर्यावर अवलंबून राहणारा व त्याच्याच प्रकाशानें दुसऱ्यास प्रकाश देणारा म्हणजे एकंदरींत सूर्याच्या वैभवावर सुख भोगणारा असा चंद्र आहे, म्हणून त्यास राणी मानिलें असावें मंगळाच्या क्रूरतेवरून त्यास सेनापती मानिलें असावें गुरु, शुक्र, हे आकाशांत बरेच तेजस्वी दिसतात,

म्हणुन त्यांस सचिव मानिलें असावें. शनि हा शेवटचा ग्रह आहे त्यास जवळ येण्याला मुळींच अधिकार नाहीं, म्हणून त्यास सेवक मानिलें असावें.

## ग्रहांच्या जाती.

ब्राह्मण—गुरु, शुक्र. क्षत्रिय—रवि, मंगळ. वैश्य—चंद्र. शूद्र—बुध. अंत्यज- शनि.

रवि शिवाय करून आकाशांतील ग्रहांपैकीं गुरु व शुक्र तेजानें श्रेष्ठ आहेत; म्हणून त्यास श्रेष्ठ जातीचे असे ब्राह्मण मानिलें असावें रवि स्वत: पराक्रमी आहे, हें मागें सिद्धकरून दाखविलें आहे. व मंगळ अग्नितत्व असल्यामुळं तो पराक्रमी मानिला गेला आहे, म्हणून या दोहोंस क्षत्रिय ठरविलें असावें. चंद्र हा प्रकाशरूपी माल सूर्यापासून आणून पृथ्वीस देतो, म्हणजे एक प्रकारचा व्यापारच करितो. या त्याच्या कृत्यावरुन त्यास वैश्य मानिलें असावे. बुध नेहमी सूर्याजवळ असतो म्हणून तो त्याचा सेवक आहे, अशा कल्पनेनें त्यास शूद्र ठरविलें असावें. शनि ग्रहमालेंतला फलज्योतिषांत घेतलेल्या ग्रहांपैकीं शेवटचा ग्रह आहे महार मांग यांच्या सारखा हा नेहमी लांब असतो, यावरून त्यास अंत्यज ठरविलें असावें.

## ३ या आकाशस्थ नवग्रहांचा बारा राशीच्या योगानें पृथ्वीवरील प्राण्यांवर शुभाशुभ जोर कसा व कां चालावा!

मनुष्यांचा व ग्रहांचा संबंध काय! आणि ते मनुष्यांवर काय म्हणून अंमल चालवितात! या प्रश्नाचे उत्तरांत ग्रहांचा मनूष्यावर अंमल कां चालतो याचीं कारणे दिलीं आहेत; व अंमल चालतो हें सिद्ध करून दाखविलें आहे. आतां तो अंमल नेहमीं सारख्या रीतीनें चालतो कीं त्यांत कांहीं फेरफार होतात व निरनिराळ्या राशींत ग्रह असतां त्याचा निरनिराळा परिणाम होतो कीं काय तें पाहूं ग्रहमालेचा राजा सूर्य आहे, तेव्हां त्याचाच परिणाम पृथ्वीवर व पृथ्वीवरील प्राणीमात्रावर विशेष होत असला पाहिजे, म्हणून तो निरनिराळ्या राशींत असतां पृथ्वीवर कसकसे फेरफार घडुन येतात व प्राणीमात्रावर कसकसा परिणाम होतो. हें पाहिल्यास इतर ग्रहांचेही निरनिराळ्या राशींत असतां निरनिराळे परिणाम घडत असले पाहिजेत याबद्दल खात्री होईल; करितां सूर्याचे परिणाम राशीपरत्वें कसकसे होतात तेपाहूं

सूर्य जरी एकच आहे व किरणद्वारा त्याजपासून जी उष्णता रूप संपत्ति बाहेर पडत असते, ती जरी नेहमी सारखी असते तरी त्याचें क्रांतीवृत्तातून भ्रमण होत असल्यामुळें प्रत्येक महिन्यास

त्याचे किरण पृथ्वीवर कम जास्त पडतात. सूर्य ज्या वेळीं सायन मेष राशींत प्रवेश करितो, त्या वेळीं थंडीचा कडक अंमल नाहींसा झालेला असतो व उष्णतेचाही कडक अंमल नसतो. त्यावेळीं नुकताच वसंत ऋतूस आरंभ झालेला असून सूर्यकिरणांचा पराक्रम कोणत्याही प्रकारें दिसून येत नाहीं, म्हणजे सूर्यकिरणांच्या अंगी तीव्रता नसते या वेळीं सौरमानाचा मधुमास सुरुहोतो.

सूर्य ज्यावेळीं सायन वृशभ राशींत प्रवेश करितो, त्यावेळीं तो किरणद्वारा आपला उष्णतारूप पराक्रम प्रकट करण्यास आरंभ करितो. व विवाहादि मंगलोत्सव होत असून राजेरजवाडे अनेक प्रकारच्या विलासांत निमग्न असतात यावेळीं सौरमानेचा माधव मास सुरुहोतो.

सूर्य ज्यावेळीं सायन मिथुन राशींत प्रवेश करितो, त्यावेळीं ग्रीष्म ऋतूस आरंभ होतो. उन्हाळा कडक होत असतो, जिकडे तिकडे उष्णवातानें हाहाकार केलेला असतो. तारीख २० मे ला या ऋतूस आरंभ होतो या तारखे नंतरची स्थिति ध्यानांत आणा. अहोरात्र सारखी अंगाची लाही लाही होत असते, वारा बहुतेक बंद असतो, म्हणून लोकांस वनविहार व जळक्रीडा करण्याची इच्छा होते. या वेळीं सौरमानाचा शुक्र नामक मास सुरु होतो.

सूर्य ज्यावेळीं सायन कर्क राशींत प्रवेश करितो, त्या वेळीं उष्णतेची कमाल झालेली असते तारीख २१ जूनला सूर्य या राशींत जातो कर्कसंक्रमणकालीं सूर्य विषुवृत्ताच्या उत्तरेस अति दूरच्या बिंदूंत असतो व उष्णतां पुष्कळ असल्यामुळें समुद्राच्या

पाण्याची वाफ फार झपाट्यानें होत असते यावेळीं सौरमानाचा शुचि नामक मास सुरू होतो.

सूर्य ज्यावेळीं सायन सिंह राशींत प्रवेश करितो, त्यावेळीं वर्षा ऋतूस आरंभ होतो तारीख २२ जुलाई हा या ऋतूचा आरंभ दिवस होय इतके दिवस सूर्यानें आपल्या प्रखर तेजाच्या योगानें पाण्याची जी वाफ केलेली असते, ती या वेळेस पर्जन्यरूपानें खाली पडत असते म्हणजे सूर्यकिरणांच्या पराक्रमाचा अनुभव प्रत्यक्ष येत असतो यावेळी सौरमानाचा नभ नामक मास सुरू होतो.

सूर्य ज्यावेळीं सायन कन्या राशींत प्रवेश करितो, त्यावेळीं पाउस पडत असल्यामुळें चोहोंकडे हिरवेंगार झालेलें असून रानांतील देखाव्यांनीं लोकांचीं मनें प्रसन्न होत असतात. अशा वेळच्या देखाव्याचें अनेक कवींनीं सुरस वर्णन केलें आहे. पृथ्वीरूपी स्त्रीनें हिरव्या रंगाचा शालू परिधान केला आहे कीं काय! अशा प्रकारची काव्यांतील कल्पना बहुतेकांस माहित असेलच. हा महिना भर पावसाचा असतो. या वेळीं सौरमानाचा नभस्य नामक मास सुरू होतो.

सूर्य ज्यावेळीं सायन तुलाराशींत प्रवेश करितो, त्यावेळीं शरदृतूस आरंभ होतो. दिवसास उन्हाळा फार कडक असतो परंतु रात्रीं थंडी असते. सूर्य तुला राशींत तारीख २३ सप्टेंबर या दिवशीं प्रवेश करितो. या वेळीं सौर मानाचा इष हा मास सुरू होतो.

सूर्य ज्या वेळीं सायन वृश्चिक राशींत प्रवेश करितो, त्या वेळीं मे महिन्या सारखा कडक उन्हाळा असतो व पित्तामुळें लोकांची वृत्ति तापट असते. सूर्य याराशींत तारीख २३ अक्टोबरच्या दिवशीं प्रवेश करितो, या वेळीं सौरमानाचा ऊर्ज हामास सुरू होतो.

सूर्य ज्या वेळीं सायन धनु राशींत प्रवेश करितो, त्यावेळीं हेमंत ऋतूस आरंभ होतो तारीख २२ नवंबर हा या ऋतूचा आरंभ दिवस होय हवा रुक्ष असून थंडी फार असते; त्यामुळे प्राणीमात्रास थंडीपासून बराच त्रास होतो या वेळीं सौरमानाचा सह नामक मास सुरु होतो.

सूर्य ज्यावेळीं सायन मकर राशींत प्रवेश करितो, त्यावेळीं थंडी अति कडक असते मगरमिठी अति बळकट असते व मगरेचा तडाखा जसा अजब आहे म्हणून प्रसिद्ध आहे. तशीच या वेळची थंडी कडक असते व तिच्या तडाख्यांत सर्व प्राणी सांपडलेले असतात आणि थंडीच्या निवारणार्थ उर्णवस्त्रांची मनुष्यांस गरज लागते या राशींत सूर्य तारीख २१ दिसेम्बर या दिवशीं येतो, हा दक्षिणायनाचा शेवटला दिवस होय. या वेळीं सौरमानाचा सहस्य नामक मास सुरू होतो.

सूर्य ज्यावेळीं सायन कुंभ राशींत प्रवेश करितो, त्यावेळी हेमंत ऋतू संपून शिशिर ऋतूस आरंभ होतो. थंडीचा कडक अंमल नाहीसा होत चाललेला असतो व त्यामुळें मटवयांतील गार पाण्याची आवश्यकता भासूं लागते. या राशींत सूर्य तारीख २१ जानेवारी या दिवशी प्रवेश करितो या वेळीं सौरमानाचा तप नामक मास सुरु होतो.

सूर्य ज्यावेळीं सायन मीन राशींत प्रवेश करितो, त्यावेळीं उष्णतेचें मान साधारण वाढलेलें असतें, पाणी वारंवार प्यावेंसें वाटतें व उष्णतेमूळें तळमळ वाढत जाते; म्हणजे बहुतेक माशा सारखी अवस्था होते या राशींत सूर्य तारीख १९ फेब्रुवारी या दिवशीं प्रवेश करितो या वेळीं सौरमानाचा तपस्य नामक मास सुरू होतो.

सूर्य निरनिराळ्या राशींत असतां त्याचा निरनिराळा परिणाम घडतो; हे वरील विवेचनावरून ध्यानीं येईल या प्रमाणेच इतर ग्रहांचेही निरनिराळ्या राशींत असतां निरनिराळे परिणाम घडत असले पाहिजेत आता हे परिणाम प्रकाशरूपाने गुरुत्वाकर्षणरूपानें ग्रहांच्या योग प्रतियोगानें व आकारमानानें, पृथ्वीपासून त्याच्या अंतराच्या माना नें मात्र घडतील याबद्दल पूर्वींचा अनुभव कसा आहे, कोणते ग्रह कोणत्या राशींत असतां काय परिणाम घडले, हल्लींचा अनुभव कसा काय आहे, वगैरे गोष्टींचा विचार करूं. चंद्राच्या आकर्षणानें समुद्रास भरतीं येते; ही गोष्ट आतां सर्वांस माहीत झाली आहे. त्यांत अमावास्येसव पौर्णिमेस जास्त भरती येते हा परिणाम सूर्य चंद्राच्या योग प्रतियोगाचा आहे पुष्कळ वेळां पावसाळ्यांत "अमावास्येचें किंवा पौर्णिमेचें ताण आहे, तेव्हां पाऊस सुरु होईल किंवा जास्त पडेल" असें कोंकणांतील लोक म्हणतात. ही कल्पना गुरुत्वाकर्षणाच्या नियमानुसारच आहे हें सहजीं ध्यानीं येईल आतां कधीं कधीं अमावास्येस किंवा पौर्णिमेस पाऊस जास्त न पडतां किंवा मुळींच न पडतां अष्टमीस देखील पडतो, आणि अष्टमीस तर फार कमी भरती येते याबद्दल

वरील अनुमान चुकीचें ठरते असें मुळींच नाहीं; तर पाऊस पडण्यास सूर्य आणि चंद्र हे दोनच ग्रह कारणाभूत नसून इतर ग्रहही या बाबतींत विचारांत घेतले पाहिजेत तसें जर केलें नाहीं तर आपल्या अनुमानांत निःसंदेह चूक होईल.

गेल्या दहा वर्षांत वरचेवर दुष्काळाच्या सुधारलेल्या आवृत्तीवर आवृत्ती निघत आहेत, लोक अन्नावांचून उपाशी मरत आहेत, शेतकऱ्यांची अति दुर्दशा झाली आहे, गरीब लोकांस दुपारची भ्रांत पडूं लागली आहे, असें कां होतें? या गोष्टीचा फल ज्योतिषशास्त्राचें दृष्टीनें विचार केला तर असें दिसून येईल कीं, पृथ्वीपेक्षां शेंकडोपट मोठाले जे ग्रह ते विषुवाच्या दक्षिणेस भ्रमण करित आहेत. इ० स० १८९६ सालीं गुरु सिंह राशींतून कन्येस जात होता म्हणजे त्याचे दक्षिणायन होतें. व शनी वृश्चिक राशींत होता, म्हणजे तोही मकर वृत्तांकडेच जात होता या प्रमाणे मोठ मोठाले ग्रह विषुवाच्या दक्षिणेस भ्रमण करित असल्यामुळे वारंवार दुष्काल पडत गेले. चालू सालीं गुरु कर्क राशीवर आहे म्हणजे विषुवाच्या उत्तरेस आहे म्हणून पाउस बरा झाला या वरून असें अनुमान निघते कीं मोठमोठाले ग्रह विषुवाच्या उत्तरेस असल्यास पाऊसकाळ चांगला होतो व दक्षिणेस असल्यास दुष्काळ पडतो. इ०स० १३९६ सालीं महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडला त्यावेळीं बहुतेक मोठमोठाले ग्रह विषुवाच्या अगदीं जवळ होते. ज्याप्रमाणे हवामान, वृष्टि, अनावृष्टि, वादळे, तुफान, दुष्काळ, मोठाल्या भयंकर रोगाच्या सांथी वगैरे बाबतींत ग्रहांचा परिणाम घडतो त्याप्रमाणेच मनुष्याच्या आयुष्यांत होणाऱ्या शुभाशुभ गोष्टींवर

ही त्यांचा परिणाम थडल असला पाहिजे; अशी वरिल विवेचना वरुन वाचकांची खात्री होईल, व पृथ्वीवरील प्राण्यांवर ग्रहांचा राशीपरत्वें शुभाशुभ जोर कसा व कां चालतो याचें अनुमान करण्यास सोपें पडेल.

## ३ मनुष्यांचा व ग्रहांचा संबंध काय? आणिते मनुष्यावर काय म्हणून अंमल चालवितात!

युरोप खंडातील निरनिराळ्या देशाच्या भोंवतीं किंवा जवळ पास समुद्र आहे. यामुळें ते लोक मुळारंभा पासूनच साहशी व दर्यावर्दी असून पुढें मोठें व्यापारीही बनले. हिंदुस्तान देशासही समुद्रकिनारा पुष्कळ आहे, परंतु तो पुष्कळ बंदरें असण्याजोगा तुटक नाहीं. पश्चिम आणि पूर्व किनाऱ्यावर नद्या पुष्कळ आहेत, पण त्यांतल्या नावा चालण्याजोग्या एक दोनच आहेत; आणि त्याही नियमित अंतरापर्यंतच अशा आहेत. या कारणानें हिंदुस्तानातील लोक दर्यावर्दी झाले नाहींत. दुसरी गोष्ट अशी कीं, कोणतेही लोक आपला माल खपविण्यासाठीं फार करून आपल्या घरुन उठून बाहेर जात नाहींत. आपल्या निर्वाहासाठीं माल लागला तर तो आणण्यास मात्र जातात. आपल्या देशांत धान्यें फळें, मसाल्याचे जिन्नस, कलाकुशलतेचे पदार्थ तयार होत, आणि

ते आपल्यास पुरून पुष्कळ उरत. पण ते विकण्यासाठीं दुसऱ्या देशांत नेण्याची काय गरज होती! ते विकले नाहींत तर दोनप्रहरची पंचाईत पडावी अशी कांहीं स्थिति नव्हती. मग मुद्दाम होऊन धोक्याचा दर्यावर्दीपणा केवळ पैसा मिळविण्यासाठीं कोण करितो! पुढें ज्यांना हे पदार्थ हवे असत त्यांना नेऊन पुरविण्याचा व्यापार मूर, आरब वगैरे व्यापारी लोक करू लागले, नंतर स्वतः युरोपियन लोकच इकडे येऊं लागले. मिळून हिंदुस्तानांतील जिन्नस घरच्या घरींच खपण्याची सोय झाली, यामुळे या देशांतील लोक दर्यावर्दी कधींच बनले नाहींत.

उत्तर हिंदुस्तानातल्या हिमालय पर्वताच्या दक्षिणेकडच्या प्रदेश यांतील सिंधु आणि तिला मिळणाऱ्या नद्या यांचा प्रदेश, तसाच गंगानदी आणि तिला मिळणाऱ्या नद्यांचा प्रदेश हे पृथ्वीच्या पाठीवरील अत्यंत सुपीक प्रदेशांपैकीं आहेत. त्याच प्रमाणे या प्रदेशांत मौल्यवान खनिज पदार्थ ही फार सांपडतात यामुळे या प्रांतांतील लोक सुखवस्तू आणि इतर प्रदेशांतील लोकांपेक्षां कमी श्रमकंटक आणि चैनी असे झाले आहेत. देशांत ज्या राजकीय उलाढाली झाल्या आहेत त्यांमध्ये या लोकांनीं फारसें कधीं मन घातलेलें नाहीं. तसेंच या प्रदेशांत हिंदुस्तानावर वायव्य दिशेकडून स्वाऱ्या करून आलेले लोक प्रथमतः शूर चपल आणि चलाख असून ते येथें राहूं लागून थोडेच दिवसांत सुखवस्तू बनून गेले अशीं उदाहरणे आहेत. रजपूत लोक प्रथमतः मोठे शूर म्हणून ख्याती होती; परंतु त्यांनीं या सुपीक प्रदेशांत वस्ती करून राज्ये

स्थापिल्यावर ते असेच सुखवस्तू होऊन त्यांची चलाखी कमी झाली आणि ते पुढे मोंगल व मराठे लोक यांना तेव्हांच वश झाले. त्याच प्रमाणे शूर आणि लढाऊ मोंगल आणि अफगाण लोक यांनाही हिंदुस्तानांत येऊन चैनी आणि निःसत्व बनण्यास वेळ लागला नाही. गंगेच्या कांठचे फार सुपीक असे बंगाल व बहार प्रांत यांतील लोकांनीही देशांतल्या उलाढालींत कधींच मन घातलेले दिसत नाही. तोच प्रकार गुजराथ प्रांतांतील लोकांच्या संबंधाचा आहे. दक्षिणेतल्या लोकांचा अगदीं उलट प्रकार आहे. या प्रदेशांत डोंगराळ मुलुख फार यामुळे इकडील मराठे वगैरे लोक चपल, शूर, चलाख असे निपजले आहेत. मद्रास इलाख्यांतला प्रदेश अधिक सपाटीचा आहे, आणी शिवाय त्या प्रदेशांत उत्तरे कडल्या धामधुमी आणी उलाढाली कधीं फारशा जाऊन पोंचल्या नाहींत, या मुळें त्या प्रदेशांतील लोक अधिक शांत आहेत. सपाट व पिकाऊ प्रदेशांतील लोक शूर व उलाढाल्ये नसतात. परंतु ते शेतकी, व्यापार, उद्योग धंद, कला कौशल्य वगैरे शांततेच्या उद्योगांत हुशार असतात. या मुळें हिंदुस्तान देशांतले जे सुपीक व सपाट प्रदेश त्यां मध्यें शेतकी उद्योग धंधे, व्यापार, कला कौशल्य यांची वाढ एक वेळीं फार झाली होती. पश्चात्य देशांतील यांत्रीक साधनांनीं हे उद्योग धंदे जरी सांप्रत निकृष्ट दशेला पोंचले आहेत, तरी तींच यांत्रीक साधनें आमच्या इकडेही साध्य झाली असतां त्यांना उर्जित दशा येण्यास वेळ लागणार नाहीं.

आधींच हिंदुस्तान हा देश विस्तृत आहे. हाच विस्तृत देश अत्यंत शीत किंवा अत्यंत उष्ण प्रदेशांत असता तर काम झाले

असते? अर्थात तशा स्थितींत सर्व प्रकारचीं साधनें मुळींच अनुकूल झालीं नसतीं, त्याचप्रमाणें पृष्ठभाग कोठें सपाट, कोठें डोंगराळ, कोठें खडकाळ, असा आहे; कोठें मोठाल्या नद्या वाहत असल्यामुळें जमीन फार मऊ व सुपीक अशी झाली आहे. अशा प्रकारचे नानातऱ्हेचे प्रदेश सर्वत्र आहेत. अशा रीतीचें जसें भूवैचित्र्य आहे तसें लोकवैचित्र्यही आहे. हिंदुस्तानांतल्या अशा प्रकारच्या भूपृष्ठच्या रचनेमुळेंच या देशांत जसे अध्यात्मिक व गहन विद्याचा विचार शांतपणें करित बसणारे बुद्धिवान लोक निपजले आहेत, तसेंच कलाकौशल्याचीं कामें करणारे उद्योगी लोकही निपजले आहेत; आणि प्रसंगीं देशाचें रक्षण करण्यास उपयोगी असे डोंगरी शूर आणि लढाऊ लोकही पैदा झाले आहेत. ही परंपरा अद्यापही नष्ट झाली नाहीं अद्याप आमच्या देशांतील बुद्धिवान लोक पाश्चात्य लोकांच्या बरोबरीनें त्यांच्या विद्या शिकतात; कलाकौशल्याच्या प्रदर्शनांत आमच्या कारागिरांचा नंबर खालीं लागत नाहीं; आणि मोठाले शूर सेनापती आमच्या देशांत पैदा होणाऱ्या कणखर शिपाई लोकांची तारीफ करीत आले आहेत. यावर कोणी असे म्हणेल कीं, असें जर आहे; तर या देशास औद्योगिकदृष्ट्या निकृष्ट दशा सांप्रत कां आली आहे? याचें कारण निराळें आहे, पण त्याचा विचार करण्याचें हें स्थल नव्हे म्हणून तसें करितां येत नाहीं.

आपला महाराष्ट्र देश आपल्यास किती मोठावाटतो! कोणीकडे धारवाड आणि कोणीकडे खानदेश, कोणीकडे कोंकण, आणि कोणीकडे सोलापूर. परंतु तोच महाराष्ट्र देश हिंदुस्तानाशीं लावून पाहिल्यास

पुष्कल लहान दिसतो. वरें हिंदुस्तानदेश एवढा अफाट व विस्तीर्णजरी आपणास वाटतआहे, तरी सबंध पृथ्वीचा नकाशा एकाद्या लहान कागदावर काढिल्यास त्यास त्यांत चारअंगुळेलांबी रुंदीची जागातरी मिळेल कीं नाहीं याची शंकाच आहे; मग महाराष्ट्र देश तर त्यांत एक लहानसा ठिपकाच दिसेल! तरी देखील त्यांतील उच्च नीच भाग, पर्वत, टेंकड्या, सपाट जमिनी वगैरेंचा तेथील रहिवाशां-वर झालेला परिणाम स्पष्ट दिसून येतो; हें मागील विवेचनावरून सहज दिसून येईल. आपली पृथ्वी इतकी मोठी आहे कीं, जलद चालणाऱ्या आगीच्या बोटींत आपण बसलों; आणि ती आग-बोट रात्रंदिवस चालत असली तरी मुंबईहून निघुन पृथ्वीप्रदक्षिणा करून परत येण्यास षण्मास पाहिजेत. त्यामानानें पाहतां हिंदुस्तानांतील पर्वत, टेंकड्या, सपाट व पिकाऊ मैदानें कांहींच नाहींत हें प्रत्येकास कबूल करावें लागेल. असें असून देखील त्यांचा तेथील रहिवाशांवर परिणाम होतो, तर मग पृथ्वी पेक्षां लक्षावधिपट मोठा जो सूर्य त्याचा व इतर मोठमोठाले ग्रह यांचा पृथ्वीवर राहणाऱ्या लोकांवर परिणाम कां होऊं नये! अवश्य झालाच पाहिजे. पृथ्वीपेक्षां सूर्य सुमारे तेरालक्षपट मोठा आहे तेव्हां एवढ्या मोठ्या विशाल गोलाचा मनुष्यावर काय परिणाम होतो तें पाहूं.

सूर्यापासून माणसांस मोठमोठाले लाभ होतात व पृथ्वीवर घडणाऱ्या सर्व हालचाली सूर्यावर अवलंबून आहेत याची कल्पना पुढील मजकूर वाचल्यानें येईल. सूर्य मध्य धरून नऊ कोटि मैलांची त्रिज्या घेऊन त्याभोंवतीं एक गोल रचिला तर

त्या गोलाच्या आंतील भागावर सूर्यापासून निघणारें सर्व तेज पडलें पाहिजे. अशा गोलाचा आपली पृथ्वी हा फारच लहान भाग होईल, व त्या भागाचें सर्व गोलांशी जे प्रमाण वसेल त्या प्रमाणानें सुर्याच्या एकंदर तेजापैकीं कांहीं अंश आपणांस मिळेल याप्रमाणे गणित करितां असें दिसून येतें कीं, सूर्यापासून दिगंतरालांत जो तेजाचा ओघ वाहत आहे त्यापैकीं पृथ्वीस काय

तो सुमारे $\frac{1}{२,००,००,००,०००}$ [ एक दोन अब्जांश ]

इतका अंश मिळतो. परंतु एवढया थोडया अंशानें पृथ्वीवर केवढी घडामोड चालली आहे पहा. पृथ्वीच्या दैनंदिन गतीमुळें सूर्यप्रकाश पर्यायाने प्राप्त होत असल्यामुळे पृथ्वीवर रात्र आणि दिवस यांची रहाटी सुरू आहे. [सूर्यप्रकाश नसेल तर पृथ्वीवर निरंतर अमावास्येच्या मध्यरात्रीप्रमाणें काळोख उत्पन्न होईल. परंतु केवळ प्रकाशरूपाने सुर्यापासून आपणांस जें सामर्थ्य मिळतें तें फारच थोडें होय. सूर्यकिरणांमध्ये केवळ प्रकाशकत्वच आहे असें नाहीं, तर उष्णता देण्याचें व रसायनव्यापार घडवून आणण्याचें त्यांमध्यें विशेष सामर्थ्य आहे. या सामर्थ्याची जी प्राप्ति आपणांस होते ती सूर्याची सर्वांत श्रेष्ठ देणगी होय. या देणगी वांचून पृथ्वीवरील सर्व व्यापार एकदम बंद पडतील व पृथ्वीस सर्वत्र मृतकळा प्राप्त होईल.

सूर्यकिरणांनी वातावरण तापले म्हणजे त्यांत प्रवाह उत्पन्न होतात. अतिसूक्ष्म मंद झुळकीपासून फार मोठ्या तुफान वाऱ्या-

पर्यंत वातावरणाची सर्व हालचाल सूर्यापासून किरणरूपानें येणाऱ्या उष्णतेच्या सामर्थ्यानें होते पृथ्वीवर येणाऱ्या एकंदर उष्णतेचें परिणाम फार मोठें आहे. पृथ्वीच्या सर्व पृष्ठावर शंभर फूट जाडांचें हिमावरण असतें तर तें सूर्यतापानें वर्षांत पूर्णपणे वितळून गेले असतें. इतकें बर्फ वितळविण्यास कितीं उष्णता पाहिजे व कितीं कोळसे जाळावे लागतील याचा विचार केला असतां सूर्याकडून आलेल्या नुसत्या उष्णतारूपी सामर्थ्याचा अजमास होईल. सूर्यकिरणांच्या अभावीं वातावरण व तसेंच सर्वमहासागर अगदीं स्थिर व निश्चेष्ट होतील, व त्यास सर्वत्र हिमाच्छादन प्राप्त होईल.

सूर्यकिरणांमुळेंच कोटयवधि खंडी पाण्याची वाफ प्रत्यहीं हवेंत भरते पुन्हा वाफेच्या द्रवीभवनानें पाउस, धुकें व दहींवरहीं उत्पन्न होतात, व त्यांमुळें पृथ्वी प्राणी आणि वनस्पती यांस राहण्यास योग्य अशी झाली आहे. नाहीं तर आकाश निरभ्र व कोरडें, नद्यांचे उगम शुष्क,, सर्व भूमि प्रदेश रुक्ष व ओसाड, असा असावयाचा. पावसावर ज्यांचें जीवित्व अवलंबून आहे अशा वनस्पति कोठून उत्पन्न होणार! पृथ्वीचें बाष्पावरण जाऊन ती अगदीं उघडीपडणार, व स्वतःच्या अंगची उष्णता गमावून आंत व बाहेर सारखीच निःसीम थंडगारहोणार!

प्राणी व वनस्पति यांच्या जीवनास सूर्यकिरणांचे उष्णता रूप सामर्थ्य आवश्यक आहेच, परंतु त्याहीपेक्षा त्यांचें रसायन सामर्थ्य विशेष आवश्यक आहे. सूर्यकिरणांच्या रसायनव्या-

पारावर वनस्पतिचें अस्तित्व व वृद्धि हीं अवलंबून आहेत, व वनस्पतिजन्य पदार्थांवर प्राणिकोटि सर्वस्वी अवलंबून आहे. कारण प्राण्यांचें सर्व अन्न वनस्पति मूलक आहे. मांसाहारी प्राण्याचें भक्ष्य देखील परंपरेनें वनस्पतिमूलकच आहे. अर्थात् सूर्य किरणांचा रसायनव्यापार नष्ट झाल्यास प्राणी व वनस्पति बरोबरच लयास जातील.

याप्रमाणें पृथ्वीवर दृष्टीस पडणारी सर्व हालचाल सूर्यकिरणद्वारा येणाऱ्या सामर्थ्यावर अवलंबून आहे. याशिवाय उष्णता विद्युत वगैरे शक्ति उत्पन्न करण्याचे आपणांस उपलब्ध असे जे मार्ग आहेत तेही परंपरेनें सूर्यमूलकच आहेत. या सर्व गोष्टींचा विचार केला असतां सूर्याचे आपणांवर किती अगणित उपकार आहेत ह्याची कल्पना होते व सूर्य हा सर्व सुखसाधनांचा ईश्वरनियुक्त दाता आहे असें पूर्णपणे मनावर ठसतें.

सूर्य पृथ्वीस जितकें सामर्थ्य देत आहे तितकेंच तो पृथ्वी एवढ्याला दोनशे कोटि गोलांस देऊं शकेल, ही गोष्ट लक्षांत आणिल्यास सूर्याचा विलक्षण महिमा व अद्भुत शक्ति यांची पूर्ण कल्पना होईल.

सूर्याचा पृथ्वीवर राहणाऱ्या माणसांवर परिणाम होतो, हें मागील विवेचनावरून ध्यानीं येईल. आता बाकीच्या ग्रहांचा परिणाम होतो कीं नाहीं, होत असल्यास कोणत्याप्रमाणानें व किती, वगैरे गोष्टींसंबंधीं विचार त्यांचें आकारमान व पृथ्वीपासून त्यांचीं अंतरें वगैरे गोष्टी लक्षांत घेऊन करूं. पृथ्वीचें आ-

आरभाग एक मानिल्यास ग्रहांची आकारमानें व पृथ्वीपासून त्यांचीं अंतरें पुढील कोष्टकांत दाखविल्या प्रमाणें आहेत.

ग्रहादिकांची आकारमानें व पृथ्वीपासुन त्यांचीं अंतरें दाखविणारें कोष्टक.

| नांव. | अकार मान पृथ्वी एक मानून- | पृथ्वी पासून अंतर. मैल लक्ष. महत्तम. | पृथ्वी पासून अंतर. मैल लक्ष. लघुत्तम. |
|---|---|---|---|
| रवि. | १२लक्षांपेक्षांजास्त | ९३८ | ९०८ |
| बुध. | ·०५२ | १३६९ | ४७७ |
| शुक्र. | ·८५१ | १६१० | २३६ |
| मंगळ. | ·१३९ | २४७६ | ३३८ |
| गुरु. | १३८७·४ | ५९७२ | ३६३२ |
| शनि. | ७४६·९ | १०२३६ | ७३७३ |
| चंद्र. | ·०२०४ | २·०५ | २·०२ |

यावरून बुध हा पृथ्वीपेक्षां फार लहान आहे, शुक्र जवळ जवळ पृथ्वी एवढा मोठा आहे मंगळ बुधापेक्षां बराच मोठा आहे व गुरू अणी शनि हे तर पृथ्वीपेक्षां शेंकडोंपट मोठाले आहेत. चंद्राचे आकारमान फारच कमी म्हणजे बुधाच्या निम्यापेक्षांही कमी आहे. परंतु तो सर्व ग्रहां पेक्षां पृथ्वीला फार जवळ आहे म्हणून तो सूर्याएवढा मोठा दिसतो व त्याचा समुद्रावर भरती ओहटी रूपानें झालेला परिणाम आपणांस स्पष्ट दिसून येतो. चंद्रा सारख्या लहान ग्रहांचा जर पृथ्वीवर परिणाम होतो व त्यामुळें झालेले व्यापार स्पष्ट दिसून यतात तर पृथ्वीपेक्षां शेंकडोंपट मोठाले जे शनि, गुरु वगैरेंचा परिणाम कांघडूं नये? अवश्य घडलाच पाहिजे. रोगराई, सांथी, भयंकर उत्पात, वादळें, धान्यादिकांची समृद्धि किंवां दुष्काळ, अति वृष्टि, अनावृष्टि, उन्हाळा, थंडी, पावसाळा, पृथ्वीवर होणाऱ्या लढाया, राजक्रांत्या, व माणसांच्या आयुष्यांत घडून येणाऱ्या सर्व लहान मोठ्यागोष्टी इत्यादि गोष्टींशीं सूर्य व चंद्र यांच्या शिवाय इतर ग्रहांचा संबंध असलाच पाहिजे यांत शंका नाहीं. आतां या संबंधीं त्यांचा जो परिणामहोणार तो त्यांच्या आकारमानावर, अंतरावर व त्यांच्या स्थितीवर अवलंबून राहील इतकेंच.

ग्रह, उपग्रह वगैरे सर्व सूर्यमाला व विश्व यांचा पसारा हा प्रकृतिचा आहे. प्र म्हणजे विशेष व कृति म्हणजे करामात तेव्हां या शब्दाचा अर्थ विशेष करामात असा झाला. तस्मात् ती स्वतंत्र नसून कोणाची तरी असली पाहिजे म्हणजे या प्रकृतीचें

सुद्धां नियमन करण्यास नियंता पाहिजेच. तो नसेल तर कांहीं व्हावयाचें नाहीं. ही प्रकृती ब्रह्मांडें उत्पन्न करिते, पण पुढील खेल करणारा नसता, तर तीं अस्ताव्यस्त आणी अचेतन राहिलीं असतीं. या ब्रह्मांडामध्यें आणि प्रकृतीमध्यें ब्रह्म किंवा परमात्मा याचा अंश प्रकट होतांच विश्व उदयास येऊन त्याची लीला सुरू झाली. मूर्तामूर्त अखिल वस्तूंमध्यें हें चैतन्य वास करून सर्व कांहीं नियंत्रितपणें चालवीत आहे.

हवा, पाणी, भूमि, आणि वीज ह्या कारणांपासून उत्पन्न होणाऱ्या वनस्पतींमध्यें त्या सर्व कारणांचे अंश वास करितात. जननीजनक यांच्या शरिराचे वर्ण, सुदृढपणा किंवा रोग आणि स्वभाव हीं संतती मध्यें अंश मात्र उत्पन्न होतात. कवडाशामध्यें रवितेज आणि उष्णता हीं सूर्या इतकीं जरी न होंत तरी कांहीं अंशीं तरी प्रत्यक्ष अनुभवास येतात; त्यापेक्षां सच्चिदानंद परब्रह्मापसून त्याचा अंश चैतन्य ह्यानें युक्त जी सृष्टि निर्माण झाली, तिजमध्यें सत् म्हणजे अनाद्यतता, चित् म्हणजे ज्ञान व आनंद ह्याचा वास असलाच पाहिजे. यावरून एकापासून उत्पन्न झालेले व ज्यांत एकाच प्रकारचीं तत्वें वास करित आहेत, असें जें विश्व व ग्रह उपग्रह यांचा परस्पराशीं संबंध असला पाहिजे; व एकाचा दुसऱ्यावर व तेथें असणाऱ्या पदार्थ मात्रावर आणि प्राणिमात्रावर कांहीं तरी परिणाम झाला पाहिजे म्हणजे अंमल चालला पाहिजे.

पृथ्वीच्या आकारमानाशीं लोहचुंबकाच्या तुकड्याच्या आकारमानाची तुलना केल्यास लोहचुंबकाचा तुकडा किती लहान

दिसेल याची कल्पना करणें देखील अशक्य तरी देखील पृथ्वी वर ठेवलेल्या सुईजवळ लोहचुंबकाचा तुकडा नेल्यास एवढ्या मोठ्या पृथ्वीच्या आकर्षणाचा कांहीं एक अडथला न होतां ती सुई लोहचुंबकाकर्षणानें लोहचुंबकास जाऊन चिकटते. सुई जवल लोहचुंबकापेक्षां कितीही मोठे व कितीही जवळ जरी दुसरे पदार्थ असले तरी त्यांचा त्या सुईवर कांहीं एक परिणाम होत नाहीं; मात्र लोहचुंबकाचा झालेला परिणाम स्पष्ट दिसून येतो. हाच न्याय पृथ्वीवरील पदार्थ व इतर ग्रह यांच्यांतही कां असू नये! समुद्राला चंद्रहा लोहचुंबक आहे, तसा हवेला हाकोणी तरी असला पाहिजे. प्रत्येक प्राणी व प्रत्येक वनस्पति यांस याप्रमाणे कोणी लोहचुंबक नसेल काय? या गोष्टीचा विचार करणारें शास्त्र फल ज्योतिषच होय. इतर शास्त्रांचा येथें कांहीं उपयोग नाहीं।

## ( ५ ) अशुभ ग्रह शांतीच्या योगानें शुभफलप्रद कसे होतात?

अशुभ ग्रहांच्या योगानें मनुष्यावर नानाप्रकारचीं संकटें येतात, रोग उत्पन्न होतात, दारिद्र्यानें मनुष्य पिडला जातो, अपमृत्यु येतो असे अनेक अनिष्ट परिणाम होतात; व ते परिणाम अशुभ ग्रहांची शांति केली असतां, फलज्योतिषशास्त्रांत जीं दानें व जप वगैरे करण्यास सांगितलें आहे, ते प्रकार केलेअसतां अनिष्ट गोष्टी टळतात; म्हणजे त्या अनिष्ट गोष्टींचा मनुष्यावर

परिणाम होत नाहीं. पण लोकांच्या नेहमीं असें पाहण्यांत येतें कीं, ज्याप्रमाणें आपणांमागें संकटपरंपरा लागलेली आहे त्या प्रमाणेंच जोशीबोवांच्यामागें सागें असते. असें असतां जोशी लोक आपल्या संकटांचें कां निवारण करू शकत नाहींत! साधारण जनसमूहाच्या अंगीं जोशी बोवांचे ज्योतिषविषयक ज्ञान किती आहे हे पाहण्याची योग्यता नसते; त्यामुळें जनामधारी जोशी आहेत त्यांजकडे पाहून लोकांच्या मनावर वर लिहिल्याप्रमाणें परिणाम होतो. व नंतर त्यांच्या तोंडून" आयुष्यांतील अनिष्ट गोष्टी टाळितां येण्यासारखे खात्रीचे उपाय जो पर्यंत अमलांत आणण्याची योग्य तजवीज कोणी केली नाहीं, तो पर्यंत म्हणजे पुढें येणारीं संकटें टाळण्याची युक्ति निघे पर्यंत फलज्योतिष शास्त्र व्यवहारोपयोगी आहे असें मुळींच म्हणतां येणारनाहीं ,, अशा प्रकारचे उद्गार निघतात. आतां हें खरें आहेकीं, ग्रहांचो शांति केल्यानें सर्वच प्रकारचीं संकटें नाहींशीं होतील असें मुळींच नाहीं; तर कांहीं संकटें अशी असतातकीं तीं टाळितांयेणें अशक्य असतें, म्हणून हें शास्त्र निरुपयोगी आहे असें म्हणणें अयोग्य आहे. समजाकीं, आपल्या शरिरांतील शक्ति खर्च होत जाऊन शेवटीं म्हातारपण येतें व तें वैद्यशास्त्रांतील कोणत्याही औषधानें घालवितांयेत नाहीं; म्हणजे शरिरांतील जी शक्ति खर्च झाली ती औषधांनीं परत आणितां येत नाहीं, व गेलेलें तारूण्य प्राप्त होतनाहीं. म्हणून वैद्यशास्त्र कांहीं उपयोगाचें नाहीं असें म्हणणें जसे वेडेपणाचें आहे त्या प्रमाणेंच फलज्योतिष शास्त्रनिरुपयोगी आहे असें म्हणणें वेडेपणाचें ठरेल.

ग्रह काय पदार्थ आहे या प्रश्नाचें उत्तरांत ग्रह आपल्या पृथ्वी प्रमाणेंच माती व दगड वगैरे द्रव्यांचे बनलेले आहेत असें सांगितलें आहे. तेव्हां या दगड मातीच्या ग्रहांची पुजा केली असतां ते कसे प्रसन्न होतात याचें उत्तर मूर्तीपुजक लोकांस द्यावयास पाहिजे असें मुळींच नाहीं अत्यंत श्रेष्ठ व परम दयालु जगचालक प्रत्येक ठिकाणीं आहे. जळीं, स्थळीं, काष्टीं, पाषाणीं तो वास करीत आहे, तेव्हा तो ग्रहांतही असला पाहिजे व ग्रहांची पूजा म्हणजे परंपरेने ईश्वराची पूजा करण्या सारखेच आहे; म्हणून पुढें येणाऱ्या संकटांचें निवारण त्या जगच्चालकाकडून होतें. जगच्चालकाच्या कृपेशिवाय कोणत्याही संकटांचे निवारण होणेंअशक्य आहे हें प्रत्येक मनुष्य कबुल करील. ग्रहांची पूजा म्हणजे परंपरेनें ईश्वराचीच पूजा होय व ती केली असतां तो आपल्या भक्तांची इच्छा पूर्ण करील यांत शंका नाहीं. या प्रमाणे अशुभ ग्रह शांतीच्या योगाने शुभफलप्रद होणें शक्य आहे व शुभफलप्रद होतात असा अनुभवही आहे याबद्दल कोल्हापूर येथें निघणाऱ्या " विश्ववृत्त ,, मासिक पुस्तकाच्या सन १९०६ च्या जुलाई महिन्याचे अंकांत निबंध माला कारांच्या लोक भ्रमासंबंधीं स्वतः च अनुभव म्हणुन एक लेख श्रीयुत रामचंद्र नारायण मंडलिक यानी लिहिला आहे, त्यांतील त्यांचा या संबंधी महाड येथील कै० वा० बाबाजी राव पटवर्धन यांच्या बद्दल जो अनुभाविक अभिप्राय आहे तो देऊन हा विषय पुरा करितो.

" अपमृत्यु टाळितां येतील अशी महाडकर जोशी बोवांची कल्पना होती. दिवा तेल वातीनें भरलेला असला तरी वाऱ्याचीझुळुक

लागून जातो; अशीच गोष्ट अपमृत्यूची आहे असें त्यांचें म्हणणें असे. तेल वातीनें भरलेल्या दिव्याला वाऱ्याची झुळुकलागूं दिली नाहीं म्हणजे ज्याप्रमाणे तेल वात सरेतों पर्यंत तो तेवण्यास हरकत नाहीं, त्या प्रमाणेंच अपमृत्यु होण्याच्या वेळची ग्रहस्थिती टाळली किंवा ग्रहांचे जप, शांति वगैरे शास्त्रोक्त कृत्यें केलीं तर आयुष्य सरे पर्यंत महामृत्यूची वेळ येई तों पर्यंत मनुष्य जगण्यास हरकत नाहीं असें त्यांचें मत होतें व त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्नही करून पाहिले होते. अपमृत्यु टाळतां कांयावे या विषयींचा वर दिलेला जोशी बोवांचा कोटक्रम कांहीं बावगा नाहीं माझ्या एका जवळच्या आप्ताचा अपमृत्यु जोशि बोवांनीं टाळला याबद्दल त्यांचे जितकें उपकारी रहावें तितकें थोडेंच होय. हा अपमृत्यु महामृत्यू होण्याचा बळकट संभवहोता, हें पुढें आमच्या प्रत्ययास आलेंय. कारण जोशी बोवांनीं सांगितलेल्या नेमक्या दिवशीं सदर आप्ताची एकाएकीं अगदीं भुईवर घेण्यापर्यंत वेळ आली होती. पुढील भविष्य अगोदर सांगून हा अपमृत्यु कदाचित् एका विवीक्षित शांतीनें टळेल असें जोशी बोवांनीं सांगितल्यावरुन सदर शांति शास्त्रोक्तरीतिनें अगोदर करण्यत आली होती व तिनें आपला प्रभाव दाखविलाही. फलज्योतिषांत सांगितलेल्या अनिष्ट ग्रहांच्या शांति किंवा जप, दानें वगैरेस' सव झूट, म्हणणाऱ्यांनीं वरील अनुभविक गोष्ट अवश्य लक्षांत ठेवावी.,,

अब्दुल वजीरखान, पठाण.

मु०—सांगोला.

॥ ईश्वर ध्यानदोध ॥

॥ नीचेलिखी पुस्तकें छपके तैयार है ॥

## लघुपुजानुष्ठानपद्धातिटिप्पणीसमेत

यह पूजन विधीं और अनुष्ठान के कामकी अद्विर्तीय पुस्तक है इसमें वेदोक्त पूराणोक्त पुजाविधी और प्रत्येक मंत्रो पर टिप्पणीं दीगईहै केवलइस पुस्तक को पढलेनेसे दूसरी पुजा तथाअनुष्ठान संबधी पुस्तक कों पढने की आवश्यकतानहीरहती मूल्य केवल ।≈ ) छआने मात्र डाक महसूल समेत रखागय है

## ॥ विजया कल्प भाषाटीका समेत ॥

यह विजयाके अनुरागीयोंके तथा डाक्टर वैद्य हकीमोंक परमोपयोगी पुस्तक है इसमे विजया ( भांग ) की उत्पत्ती गुण प्रत्येक रोगमें सेवनीकरीति तथा विजया के कल्प सिद्ध करने कि मंत्र सहित विधी भलिभांती इस हेतु वर्णन कीगई है कि वनौषधियोंका निघंट कैसा बननेसे परमोपयोगी होसक्ताहै उसका नमुना वताया है मूल्य केवल ।) आने मात्र डा० म० )॥

## ॥ ॐकार महिमा प्रकाश ॥

यह वही पुस्तक है जिस्की हिंदुस्थान भरके हिंदी गुजराथी मराठी समाचार पत्रोने तथा राजा महाराजा धर्माचार्य गणोंने और धनी मानी महाशयोने अेक स्वरसें प्रशंसा कीहै इस्मे खुबी यहहै कि ॐ शब्द के आठ टुकडे जो पुस्तकके साथ भेजे जाते है

उनके उलट पुलट जोडनेसें हिंदी गुजराथी अंग्रेजी उर्दु इन ४ भाषाकी वर्णमाला और अंक तथा आनापाइ वगेरा बालक किंडरगार्टन केतरकोब से खलते २ सीखलेता है और युवक तथा वृद्धपुरूषोंको ज्ञान लाभ होनेके शिवाय ॐ शब्दका स्वरूप ज्ञान होजाताहै । मूल्य रू० १) मात्र रक्खागयाहै मुमुक्ष और विद्वानोंको विनामूल्य देनेमे आतिहै.

# छपताहै ! छपताहै !! छपताहै !!!

## ज्योतिष के शोखीनों चलो लेनेको तैयार होवो.

जो आपको अपना शुभा शुभ योगायोग और भावीफल घर बैठे जाननेकी इच्छा होवे तो नीचे लिखी दोनों पुस्तकों खरिदिये और अपना ग्राहक श्रेणीमें नामलिखवाइये नाम लिखवाने मे देरी करोगेतो पछतावोगे क्योंकी पुस्तकें नियामित संख्यामे ही छपने से अग्रीम ग्राहकोंकोस्वल्प मूल्यमें मिलेगा और पीछे जादमूल्य देतेभी कदाचित हाथनहीं आवेगी इसलिये जल्दी नाम लिखवाइये तो छपनेबाद वी० पी० से आपके सेवामें भेजनेमें आवेगा ।

## १ जातकतत्व
## हिंदी भाषा व गुजराती टीकासमेत
## २ दशाफल दर्पण टीप्पणी समेत

जातकतत्व—यह ग्रंथ १५१ फलित के ग्रंथोका सार लेकर एक एक श्लोक का तात्पर्य ४ चार चार छे २ अक्षर में खींचके ऐसा

उत्तम बनायागया है कि जिसके पढ़नेसे ज्योतिषके फलितशास्त्र की कोइभी पुस्तक देखनेकी जरूरत नहीं पडसके ऐसा कोई ग्रंथ नहीं बचा है कि जिसकासार इसमें नहीं आयाहै इस ग्रंथके लिये यदि यों कहाजाय की सागरको गागरमे भरदिया गया तो कोई अत्युक्ती नहीं होगी इसकी ५ आवृती मूल मात्रकी छपचुकी और हाथोहाथ बिकगई है और फिरभी इसकी मांग धडाधड आ-रहीहै। इसलिये अबकी बार इसकी हिंदी १ और गुजराती २ ऐसी दो भाषाकी टीकासे सुसज्जीत कर हिंदी और गुजराति भाषा के रसिकोंके लिये तयार कियागयाहै जिसमे कई नवीन विषय और कई अनुभव की हुई फल देखनकी कुंजिये विस्तार पूर्वक ऐसी सरल भाषा मे लिखी गई है जिसको देखने से फिर किसी को पुछनकी आवश्यक्ता नहीं रहेगा आप स्वयं समझ सकतेहैंकि १५१ फलित ग्रंथोंका तत्व की पुस्तक कैसी अनुपम होना चा-हिये, बस यह १ एक पुस्तकही आपको १५१ पुस्तकोंका काम देने वाली है इसको जानने वाले हजारों विद्वान मोजूदहै और ये स्वयं प्रशंशा करते हैं इस लिये जादा प्रशंशा करना वृथा है "नहीं कस्तूरिकागंधः शपथेन विभाव्यते" सो इसे एक वखत देखेगा स्वयं मंगावेगाही।

इसमें क्या २ विषय है वह संक्षेप से नीचे दर्शाते है.

जातकतत्वके मुख्य पांच तत्व (भाग) है उसमें प्रथम संज्ञा तत्वहै जिसमें राशियोंका स्वरूप संज्ञा दशा वर्ग साधनकागणित ग्रहों की अवस्था और स्पष्टग्रह साधन व दशासाधन को रीति ऐसी सुगम बताई गई है कि जन्मपत्रीका गणित अच्छि तरहसे कोईभि गणित का जानने वाला करसके.

२ दूसरा सूतिकातत्व है जिसमें सूतिकाज्ञान जन्मस्थान दीपक शय्या घर उसूतिका कष्टप्रसव बालकके रिष्टयोग रिष्टभंग शुभा शुभ जन्म वगेरा असे युक्ति से योग लिखे गये हैं कि जिसके द्वारा लग्न खराहै के नहीं यह निश्चय करसके.

३ तीसरा प्रकार्णतत्वहै जिसमें द्वादश भावका विचार असी सूक्ष्म रीति से वर्णित कियागया है कि ऐसा विचार प्रत्येक भावका किसी ग्रंथ में कत्रित मिलना असंभव है। इसीमें मिश्रविचार है जिसमें अनेकयोग जो भावविचार में नहीं आये है व वर्णितहै॥

४ चौथा स्त्री जातक का तत्वहै इसमें स्त्रियोंके कुंडली के समस्त शुभा शुभ योग समस्त फलीत ग्रंथ मेसे एकत्रित कर वर्णन किये गये है।

५ पांचमा दशातत्व है इसमें दशाविचार वर्णितहै

इसप्रकार यह ग्रंथ पांच विभागमें वर्णितहै इसका जो आगामि ग्राहक होंगे उनसे २॥) रूप पीछेसे होंगे उनसे ४) रु. लगेंगे आवेगा और टपाल खर्च शिवाय यमें देना पडेगा।

## २ दशाफलदर्पण टिप्पणिसमेत।

यह ग्रंथसमस्त फलीत ग्रंथोमेसे संग्रह करके दशाफल देखनेका इसलिये परमोपयोगी बनायागयाहै कि दशाफल विचार का स्वतंत्र ऐसा कोई ग्रंथ हमें नहीं कि जिसमें स्वतंत्र रूपसे दशा का फलविचार उत्तम रीतिसे करसके.इसत्रुटी के कारणही जोतिषी लोक जन्म पत्रीतो बडीबनातेहै परदशाका फल विचार जैसा चाहिये वैसा लिखही नहीं सक्ते अतएव इस क्षतीको मिटाने के लिये ही यहग्रंथ तयार कियागया है इस्मे कमसे कम १०००० दश हजार श्लोक की संख्या दश विभागोंमे विभक्त कीगईहै जिस्में

प्रथम वि ।ग मे दशा प्रयोजन ४२ बेयालीस प्रका की दशाका भेद और उनके साधन क नको उदा रण सहित गति और उन दशा ओंके चक्र तथा उनमें के कौनसी दशा मुख्य है उस । निर्णय कह कर आगे संपूर्ण दि अनेक प्रकार की दशा फल का भेद वि तार पूर्वक वर्णित है तथ दशाफल बाधक ग्रह और शुभा शुभ मध्यानि कृष्ट दशा क निश्चय पूर्वक उच्च नीच मूल त्रिकोण स्वक्षेत्र शत्रु मित्र मित्रादि पांचो भेद सहित अस्त उ द न वक्र मार्ग गतिस्थ फल । दग्बल स्वमवांशवलोपेत राहु युतादि विशेष २ दशा फलका सूक्ष्म विचार और द सुख, धन भ्रातृ, तृ, ग्रह, ग्राम, मित्र, वाहन. विद्या बुद्धि. पुत्र ोग, शत्रु, भार्या मरण, निधिलाभ, भाग्य, धर्म, राज्य. लाभ, व्यय मुसाफरी आदि बारों भाव जनित फल किस २ दशाम होगा और किस २ दशामे उपरोक्त बातोंकी हानि ोगी उसकी दशा के ऊपर ही विस्तार पूर्वक फल विचार और भी अन्याय विशेष मिश्र फल विचार तथा दशा प्रवेश लग्नस दशा फलका सूक्ष्म विचार दशावाहन फल तथा जाग्रतादि बालादि दीप्तादि विनादि शयनादि अवस्थ त ग्रहोंका विशेष रूपसे दशाफल विचार वर्णित है।

२—दूसर विभागमें सूर्यादि नव ग्रहाको विंशोतरी, महादशा का प्रथक् २ महादशाफल विस्तारपूर्वक ऐसी युक्ति से संग्रह कियागया है कि जिसके द्वारा एक २ ग्रह की दशा के फल का विचार क से कम १०० सौ सौ श्लोकस निश्चय करसके.

३—तीसरे विभागमें अंतर्दशा संबंधी विचार का समस्त सामान्य और सूक्ष्मफल विचार विस्तार पूर्वक प्रथक् २ ग्रहोंका ऐसा लिखा है कि समस्त अंतर्दशा का सूक्ष्मफल विस्तृतरूपसे विचार अनायास करसके।

४-५-६ चौथे पांचमे छटे विभागमें क्रमसे उपदशा सूक्ष्मदशा प्राणदशा ओंका विस्तार पूर्वक निःशेष फल विचार वर्णित किया गया है।

७-सातवे मे अष्टोतरी की पांचही प्रकार की दशाका विस्तार पूर्वक फल विचार है।

८-आठमे विभागमे योगिनी दशाके दशांतदशा दिकका समग्र फल विचार वर्णित है॥

९-नवमें विभागमे चरस्थिर रुद्र शूल वर्णदादि जैमिन्युक्त समस्त दशा अंतर्दशाओंका फल विचार है।

१०-दशम विभागमें उक्तदशा ओंके अतिरिक्त शेष समस्त दशाओंका फलविचार और उपसंहार है इस प्रकारयह ग्रंथ सर्वांग सुंदर तयार कियागया है इसकी कीम्मत आगामी ग्राहक होनेवाले से ४) और पीछसे लेनेवालों से ६) रुपे लेनेमें आवेगा टपाल खर्च अलग लगेगा।

उपरोक्त समग्र पुस्तके नीचे लिखे हुवे पतेपर मिलेगा और जो आगामि ग्राहक होने वाले ग्राहक होगे उनका मुबारक नाम भी नीचे लिखे पते पर हो नोंधनमे आवेगा॥

जून तारीख १ जून १९१२ के पूर्व जो लोग अपना नाम लिखावेगे उनकाही नाम आगामि ग्राहको मे गिना जावेगा। दोनु पुस्त को के ५०० पांचसो ग्राहक होजानेसे तारीख १ जूनसे छापना शुरु हो जावेगा।

ज्योतिषरत्न पं० श्रीनिवास मह्लारे वजीकार्मा.

राजकोट्— काठियावाड.

# आर्डर फार्म

महाशयजी : ता० मा० सन १९११

निम्न लिखित पुस्तका का आगामी ग्राहकों की श्रेणीमे मेरानाम लिखलेवे और पुस्तके तयार होने पर मेरेनाम पर वी०पी०द्वारा भेजदेवे.

१ जातकतत्व हिंदी व गुजराती भाषाटीका सहित—प्रति

२ दशा फलदर्पण प्रति.

नाम————————————

पता————————————

☞ मेहरबानीकरके नाम ठिकाणा साफ खुले अक्षर मे लिखतरहे।

# अवश्य देखिये ।

## ज्योतिष कार्यालय

हमारे ज्योतिष कार्यालयमें जन्मपत्र व शरीर लक्षण परसे लग्न, शादी, प्रीतियोग, नोकरी, धंधा, प्रमोशन, मुसाफरी, लाभ, दुश्मनाई, विवाद, परीक्षामेंपास, नापास वगैरा२ प्रश्नोंका उत्तर तथा जिंदगी का खरस्तर भविष्य फल सप्रमाण सयुक्तिक प्राचीन तथा अर्वाचीन शास्त्रोंके अनुरूप कहके फलित शास्त्रकी सत्यता सिद्ध करनेमें आता है.

और जन्मपत्र, वर्षफल, प्रश्नपत्र जन्माक्षरवगैरा नियत् तथा सायन जैसी जिसकी इच्छा है उसी पद्धती के रीतिसे अनेक परिश्रम द्वारा शुद्ध बनाके देने में आता है.

और ज्योतिष के अत्यावश्यकीय नवीन ग्रंथ संग्रह किये गये हैं तथा किये जारहे हैं. और टीका भी करनेमें आती है

एवं ग्रहलाघव केतकी तथा ब्रह्मपक्षके आने सुद्ध नवीन पंचांग कोई बनाना चाहे तो बनाके देनेमें भी आते हैं.

एक वक्त मिलके तथा पत्राचार द्वारा अवश्य अनुभवसे खात्री कीजिये .

ज्योतिष रत्न पं० श्रीनिवास महादेवजी शर्मा.

राजज्योतिषी रतलाम ठि० ज्योतिष कार्यालय.

मो० रतलाम.